अकृषि विद्यापीठे व अशासकीय अनुदानित महाविद्यालयांच्या आस्थापनेवर अनुकंपा तत्वावरील नियुक्तीसाठीच्या प्रतीक्षायादीवरील निर्बंध शिथील करण्याबाबत...

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग
शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण २०१४/प्र.क्र.१५/१४/वि.शि.१
मंत्रालय विस्तार भवन,
मुंबई -४०० ०३२
तारीख: १२ मे, २०१५

संदर्भ :-

शासन पत्र, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र.एनजीसी २००४/प्र.क्र.६६/२००३/वि.शि.-४, दि.१२ ऑगस्ट, २००४

शासन निर्णय,वित्त विभाग, क्र.असंक-१०१०/प्र.क्र.०१/१०,वित्तीय सुधारणा-१, दि.५ जून, २०१०

शासन निर्णय,वित्त विभाग क्र.पदनि-१०१०/प्र.क्र.८३/१०,वित्तीय सुधारणा-१, दि.२९ नोव्हेंबर, २०१०

शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक पदनि-२०१२/प्र.क्र.१५/१२/वित्तीय सुधारणा-१, दि.२२ मार्च, २०१२

शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.अकंपा-१०१४/प्र.क्र.३४/आठ, दि.१ मार्च, २०१४

शासन पूरकपत्र, सामान्य प्रशासन विभाग, क्र.अकंपा-१०१४/प्र.क्र.३४/आठ,दि.२ मे, २०१४

## प्रस्तावना

शासकीय विभाग व कार्यालये आणि शासन अनुदानित संस्थांमधील गट-क व गट-ड संवर्गातील पदभरतीवर शासनाच्या संदर्भाधीन क्र.२ च्या शासन निर्णयान्वये निर्बंध घालण्यात आले होते. संदर्भाधीन क्र.३ च्या शासन निर्णयान्वये दि.२२.०८.२००५ पूर्वीच्या अनुकंपा नियुक्तीच्या भरती सूचीतील पदे निर्बंधातून वगळण्यात आलेली होती व दि.२२.०८.२००५ नंतरच्या अनुकंपा यादीतील उमेदवारांवरील भरतीवरील निर्बंध कायम ठेवण्यात आले होते. तसेच संदर्भाधीन क्र.४ च्या शासन निर्णयान्वये दि.३१.१२.२०११ पर्यंतच्या अनुकंपा यादीतील उमेदवारांवरील भरतीसाठीचे निर्बंध शिथिल करण्यात आले होते.

२. आता संदर्भाधीन क्र.५ च्या शासन निर्णयान्वये व संदर्भाधीन क्र.६ च्या शासन पूरक पत्रान्वये अनुकंपा तत्वावरील पदे सन २०१२ या भरती वर्षापासून गट -क॰ व -ड॰ मधील प्रतिवषी रिक्त होणा-या पदांच्या १० टक्के मर्यादेत भरण्याची कार्यवाही सर्व नियुक्ती प्राधिका-यांनी तात्काळ करण्याबाबत निर्देश दिलेले आहेत.

३. वरील परिच्छेद क्र.२ ला अनुसरुन राज्यातील सर्व अकृषि विद्यापीठे व संलग्नित अशासकीय अनुदानित महाविद्यालयातील अनुकंपा तत्वावरील पदांच्या नियुक्तीबाबत शासन स्तरावरुन निर्देश देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक-**

४. वरील वस्तुस्थिती विचारात घेऊन शासन खालीलप्रमाणे निर्देश देत आहे :-

I) राज्यातील अकृषि विद्यापीठे व संलग्नित अशासकीय अनुदानित महाविद्यालयांतर्गत अनुकंपा नियुक्तीसाठी गट -क॰ आणि -ड॰ मधील प्रतिवर्षी रिक्त होणा-या पदांच्या १० टक्के पदे अनुकंपा तत्वावर भरता येतील. या वाढीव मर्यादेचा एक वर्षानंतर फेरआढावा घेण्यात यावा.

II) अनुकंपा तत्वावरील पदे सन २०१२ या भरती वर्षापासून गट -क॰ व -ड॰ मधील प्रतिवर्षी होणा-या पदांच्या १० टक्के मर्यादेत भरण्याची कार्यवाही सर्व अकृषि विद्यापीठांच्या व संलग्नित अशासकीय अनुदानित महाविद्यालयांच्या नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी तात्काळ करावी.

III) शासनाच्या दि.१२ ऑगस्ट, २००४ च्या पत्राद्वारे कळविल्याप्रमाणे विद्यापीठे व संलग्नित अशासकीय अनुदानित महाविद्यालयांतर्गत अनुकंपा तत्वावर भरावयाच्या पदाकरिता एकत्रित यादी प्रत्येक विद्यापीठाने व संलग्नित अशासकीय अनुदानित महाविद्यालयाने स्वतंत्ररीत्या ठेवून व त्यामधून पात्र उमेदवारांच्या नियुक्त्या संबंधित शासन निर्णयातील निकषानुसार करण्यात याव्यात.

५. सदर शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.२९९, दि.१७.०९.२०१४ नुसार त्यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५१२१७१३०१९६०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Harshwardhan Tukaram Jadhav

Digitally signed by Harshwardhan Tukaram Jadhav
DN: CN = Harshwardhan Tukaram Jadhav, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.05.13 14:38:40 +05'30'

**( हर्षवर्धन तु. जाधव )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२. कुलगुरु, सर्व अकृषि विद्यापीठे
३. सर्व सह सचिव/उप सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
४. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण
६. सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
७. निवड नस्ती (वि.शि.१)